**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ वे जयंती वर्ष सन २०१५-१६ हे वर्ष "समता व सामाजिक न्याय" वर्ष साजरे करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सान्यावि-२०१५/प्र.क्र.१६३/बांधकामे

कक्ष क्र.१४०, पहिला मजला, मंत्रालय विस्तार,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु मार्ग
मुंबई- ४०० ०३२
तारीख: ९ ऑक्टोंबर,२०१५

**वाचा :-**

१) **मंत्रिमंडळ निर्णय दिनांक २२ सप्टेंबर,२०१५**

**प्रस्तावना :-**

१. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे भारतीय राज्य घटनेचे शिल्पकार म्हणुन ओळखले जातात. भारतीय राज्य घटना तयार करण्यासाठी त्यांनी अथक परिश्रम घेतले आणि त्यामध्ये स्वातंत्र्य, एकात्मता, बंधुत्व, समानता इत्यादी तत्वाबरोबर सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागासलेल्या लोकांसाठी व अनुसूचित जाती, जमाती, इतर मागासवर्गीय यांच्या सामाजिक व शैक्षणिक उत्थानासाठी अतुलनीय तत्वे भारतीय राज्यघटनेत समाविष्ट केली. त्यांनी शासन संस्थेमध्ये लोकशाही व्यवस्थे बरोबरच विधी विधान संस्था (कायदेमंडळ), न्याय संस्था आणि कार्यकारी संस्था या तीनही व्यवस्थेच्या स्वतंत्र्यता व उत्तरदायीत्वाबद्दल अतुलनीय व्यवस्था केली. त्यांनी अनुसूचित जाती, जमाती, इतर मागासवर्गीय तसेच समाजातील दुर्बल घटकांसाठी आणि महिला सक्षमीकरणासाठी आयुष्यभर केलेला संघर्ष व त्यागामुळे या देशातील मानव समाज उपकृत आहे. डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रातील योगदान अमुल्य असुन आधुनिक भारत घडविण्यामध्ये त्यांचा मोलाचा सहभाग आहे. त्यांच्या प्रति कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आणि त्यांच्या संघर्षाची समाजाला प्रेरणा मिळावी यासाठी दिनांक १४ एप्रिल, २०१५ ते १४ एप्रिल, २०१६ हे वर्ष "समता व सामाजिक न्याय वर्ष" म्हणून साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

२. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ वे जयंती वर्ष दिनांक १४ एप्रिल, २०१५ ते १४ एप्रिल, २०१६ हे वर्ष "समता व सामाजिक न्याय वर्ष" म्हणून साजरे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ व्या जयंती वर्षामध्ये खालील कार्यक्रम/उपक्रम हाती घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र | कार्यक्रम भाग-१ | अंदाजित खर्च (रु.कोटी) |
|---|---|---|
| १ | भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे १२५ व्या जयंती वर्षात इंदूमिल येथील जागेवर आंतरराष्ट्रीय स्मारकाच्या बांधकामाचा शुभारंभ करणे. | (नगर विकास विभाग) |
| २ | भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर हे परदेशात उच्चशिक्षण घेत असताना त्यांचे १९२१-२२ या कालावधीत वास्तव्य असलेले लंडन येथील घराचे "ऐतिहासिक स्मारक" म्हणून विकासाची व वापराची कार्यवाही करणे. | १०.०० |
| ३ | अनुसूचित जातीमधील नोकरी करणाऱ्या महिलांसाठी (Working Women) साठी मुंबई, पुणे व नागपूर येथे वसतीगृहाची सोय करणे. | १०.०० |
| ४ | केंद्र शासनाने स्थापन केलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर फाऊंडेशनच्या धर्तीवर महाराष्ट्रात "डॉ.बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठानची" स्थापना करणे. | १०.०० |
| ५ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीवर्षा निमीत्ताने राज्यात किमान ५० तालुका स्तरावर ५० मुलींसाठी वसतिगृहे बांधणे. | २०.०० |
| ६ | भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाशी निगडित असलेले घटनास्थळे व महत्वाच्या ऐतिहासिक स्थळांना पर्यटनाचा दर्जा देवुन या स्थळांचा विकास करणे. | २०.०० |
| ७ | निवडक दलित वस्तीच्या सर्वंकष विकासाची योजना तयार करुन कार्यान्वित करणे. | २०.०० |
| ८ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे या संस्थेसाठी पुणे/ पुणे शहर लगतच्या परिसरात नवीन इमारत व संकुल निर्माण करणे, (त्यामध्ये प्रशासकीय इमारत, ऑडिटोरियम, वर्ग खोल्या, वाचनालय, खेळाची सोय, अधिकारी व कर्मचारी यांचे निवासस्थान, वसतीगृह, गेस्ट हाऊस, गार्डन, सोलर सिस्टम, इत्यादींची, व्यवस्था करणे.) | १०.०० |
| | **एकूण :-** | १००.०० |

| अ.क्र. | <u>कार्यक्रम भाग-२</u> | अंदाजित खर्च (रु.कोटी) |
|---|---|---|
| १ | भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी या देशाच्या सामाजिक, शैक्षणिक, राजनैतिक व आर्थिक परिवर्तनासाठी केलेले कार्य, तसेच समता व सामाजिक न्याय या विषयीच्या अनुषंगाने चित्ररथाच्या माध्यमातून प्रसिध्दी देणे. | १.०० |
| २ | भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची दुर्मिळ छायाचित्र उपलब्ध करुन घेवून अत्युत्कृष्ठ पुस्तक तयार करुन वाटप करणे. तसेच भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर, महात्मा जोतीबा फुले, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे, राजर्षि छत्रपती शाहु महाराज, इ. महापुरुषांच्या संदर्भातील साहित्य, तसेच समता, सामाजिक न्याय, बंधुत्व, स्वातंत्र्य, वैज्ञानिक जाणीव जागृती, जातीय दुर्भावनेचे व अंधश्रध्देचे निर्मुलन, व्यसनमुक्ती, राष्ट्रीय एकात्मता, सांप्रदायिक सहिष्णुता, इ. विषयांच्या संदर्भातील पुस्तकांचे निशु:ल्क वाटप करणे व या विषयी विविध साहित्यांचे प्रकाशन करणे. | १.५० |
| ३ | भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे अर्थशास्त्र, महिला सक्षमीकरण, मानववंशशास्त्र, राष्ट्रीय सुरक्षा, विदेश निती इ. बाबतचे विचार जनसामान्य व सामाजातील अनेक स्तरावर माहिती होणे आवश्यक आहे. यासाठी सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक, राजकीय इ. क्षेत्रात डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी दिलेल्या योगदाना विषयी परिसंवाद, चर्चासत्र, कार्यशाळा, प्रदर्शन इ. चे आयोजन करणे. | १.८७ |
| ४ | राज्यातील प्रत्येक ग्रामपंचायत कार्यालय व प्रत्येक पोलीस स्टेशनमध्ये भारताच्या संविधानाची उद्देशिका फ्रेम करुन पोहचविणे. | १.९५ |
| ५ | “समता कॅलेंडर २०१६” तयार करणे आणि प्रत्येक शाळा, महाविद्यालय, पंचायत राज संस्था व स्थानिक स्वराज्य संस्थांचे कार्यालय, शासकीय/ निम शासकीय कार्यालये, इ.ठिकाणी वाटप करणे. | ०.२६ |
| ६ | विद्यालये, महाविद्यालये, विद्यापीठे व इतर शैक्षणिक संस्थामध्ये समता, सामाजिक न्याय, बंधुत्व, स्वातंत्र्य, वैज्ञानिक जाणीव-जागृती, जातीय दुर्भावनेचे व अंधश्रध्देचे निर्मुलन, व्यसनमुक्ती, राष्ट्रीय एकात्मता, सांप्रदायिक सहिष्णुता या विषयी व्याख्यान आयोजित करणे. | १.२५ |

| अ.क्र. | कार्यक्रम भाग-२ | अंदाजित खर्च (रु.कोटी) |
|---|---|---|
| ७ | पत्रकारांची जिल्हा स्तरीय कार्यशाळा घेणे व त्यांना पुस्तकांचा संच वाटप करणे. | ०.२९ |
| ८ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे Constituent Assembly मधील डिबेट्स व त्यातील विशेष करुन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण, स्पष्टीकरण, मार्गदर्शन तसेच समता, सामाजिक न्याय व तत्सम विषयासंबधी विविध टी. व्ही. चॅनलवर चर्चासत्र घडवून आणणे. | २.०० |
| ९ | सर्व जाती-धर्मातील १२५ व्यक्तींना समता, सामाजिक न्याय व या विषयाशी निगडीत बाबींवर संस्थोधन करण्यासाठी M.Phil/ P.hd करण्यासाठी बार्टी, पुणे मार्फत "फेलोशिप" देणे. | १.८६ |
| १० | अनुसूचित जातीच्या राष्ट्रीय स्तरावर खेळलेल्या खेळाडूंना (वैयक्तीक स्पर्धा) आंतरराष्ट्रीय स्तरावर खेळण्यासाठी कोचिंग सुविधा देणे. | ०.५० |
| ११ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी लिहिलेले सर्व ग्रंथ व साहित्यांची अत्यंत आकर्षक छपाई करुन ते देशातील सर्व विमानतळे, सर्व महत्वाची रेल्वे स्थानके, नामवंत पुस्तकालय, क्रॉसवर्ड व ऑक्सफोर्ड इ. ठिकाणी नाममात्र किंमतीत विक्रीसाठी ठेवणे. तसेच हे साहित्य डिजिटाईज्ड करुन (पी.डी.एफ.स्वरुपात) वेबसाईटवर उपलब्ध करुन देणे. | १.०० |
| १२ | डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनकार्यावर आधारीत तसेच व सामाजिक न्याय विभागामार्फत मागासवर्गीय समाजाच्या विकासासाठी राबविण्यात येणा-या विविध योजना, यशोगाथा, शासनाकडून विविध प्रकारचे करण्यात येणारे आवाहन, समता, सामाजिक न्याय व त्यासंबंधी विविध विषय, इ.बाबत चांगले व्हिडिओ स्पॉट, सांस्कृतिक कार्यक्रम, जलसा, नाटक (DAVP च्या दराचे अधीन राहून), इ.तयार करुन विविध टी. व्ही. चॅनलद्वारे प्रसिध्दी देणे तसेच या विषयी रेडीओ, सोशल व प्रिंट मिडिया इ.च्या माध्यमातून व्यापक कार्यक्रम राबविणे. | ८.०० |
| १३ | समाजाभिमुख व सामाजिक सद्भावना निर्माण करण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तर समिती स्थापन करुन या समितीस योग्य वाटेल अशा विविध कार्यक्रमांचे आयोजन करणे. तसेच राज्यामधील राजपत्रीत अधिका-यांसाठी जिल्हास्तरीय एक दिवसीय कार्यशाळा घेणे. | ०.७५ |

| अ.क्र. | कार्यक्रम भाग-२ | अंदाजित खर्च (रु.कोटी) |
|---|---|---|
| १४ | प्रत्येक तालुका स्तरावर समता, सामाजिक न्याय, बंधुत्व, स्वातंत्र्य, वैज्ञानिक जाणीव-जागृती, जातीय दुर्भावनेचे व अंधश्रध्देचे निर्मुलन, व्यसनमुक्ती, राष्ट्रीय एकात्मता, सांप्रदायिक सहिष्णुता या विषयावरील व्याख्याने आयोजित करणे. | **१.७७** |
| १५ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे लेखन व भाषणे तसेच महात्मा जोतीबा फुले, अण्णाभाऊ साठे, छत्रपती शाहू महाराज यांचे समग्र वाङ्मय साहित्य व इतर साहित्यांचे डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे या संस्थेद्वारे प्रकाशित करणे. | **१.००** |
| | **एकूण :-** | **२५.००** |
| | **एकुण :- (कार्यक्रम भाग-१ व भाग-२ )** | **१२५.००** |

४. वरील योजना / कार्यक्रमांना प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचे कामनिहाय आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येतील.

५. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती निमित्त आयोजित करावयाच्या कार्याक्रमांकरीता मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय) यांच्या अध्यक्षतेखाली खालील समिती गठित करण्यात येत असुन, सदरील कार्यक्रमांत आवश्यकतेनुसार दिलेल्या तरतुदीच्या अधीन राहुन योग्य ते बदल करण्यास तसेच याबाबतचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार या समितीस राहतील.

| अ.क्र. | अध्यक्ष व सदस्य | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, | अध्यक्ष |
| २ | मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, | सदस्य |
| ३ | मा.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य |
| ४ | महासंचालक,डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था | सदस्य |
| ५ | आयुक्त, समाजकल्याण, पुणे | सदस्य सचिव |
| ६ | उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (बांधकामे) | सदस्य |

६. वर नमुद भाग-१ व २ मधील योजना/कार्यक्रमांचे संनियंत्रण करण्याची जबाबदारी अनुक्रमे आयुक्त, समाजकल्याण, पुणे व महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांची राहील. त्यांनी वेळोवेळी या कामांच्या प्रगतीचा व खर्चाचा आढावा घ्यावा व त्याचा तपशिल शासनास पाठवावा.

७. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी या कार्यक्रमांकरीता त्यांच्या अधिनस्थ स्वतंत्र “संनियंत्रण कक्ष” निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

त्यांनी आवश्यकतेनुसार मुंबई, पुणे व नागपूर येथे यासाठी लागणारा आवश्यक अधिकारी-कर्मचारी वर्ग मानधन/करारतत्वावर उपलब्ध करुन घ्यावा.

८. वर नमुद भाग-१ व २ मधील योजना/कार्यक्रमांसंबधात आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना "आहंरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी कार्यक्रमाच्या भाग-२ मधील उपक्रम राबविण्यासाठी लागणारा निधी महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन द्यावा.

९. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त राबवावयाच्या योजना कार्यक्रमांसाठी सन २०१५-१६ या वर्षाकरीता पुरवणी मागणीद्वारे एकुण रु.१२५.०० कोटी तरतुद मंजूर करण्यात आली आहे. या कार्यक्रमाअंतर्गत भाग-१ मधील योजनांवरील आवर्ती खर्च हा सन २०१६-१७ व सन २०१७-१८ मध्ये अनुसूचित जाती उपयोजनेअंतर्गत उपलब्ध होणाऱ्या तरतुदीमधुन भागविला जाईल.

१०. वर नमूद हाती घ्यावयाच्या योजना/कार्यक्रमावरील खर्च हा मागणी क्र. एन-०३, मुख्य लेखाशीर्ष :-२२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९- अनुसूचित जाती घटक योजना, ०२ - भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे, (योजनांतर्गत -दत्तमत्त) लेखाशीर्ष - २२२५ डी ८२३ या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ मध्ये करण्यात आलेल्या तरतुदीमधुन खर्ची टाकण्यात यावा.

११. हा शासन निर्णय मंत्रिमंडळाने दिनांक २२.९.२०१५ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे

सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१५०९२२१७१६०५८८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2015.10.10 16:18:27 +05'30'

(दि. रा. डिंगळे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. सर्व मा. विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य

५. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई

६. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई

७. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,

८. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-२, नागपुर,

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,

१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,

११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

१३. विभागीय आयुक्त, सर्व विभाग

१४.जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.

१५. आयुक्त, समाजकल्याण, पुणे

१६. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे

१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा

१८. सर्व सह/उप सचिव, अवर सचिव, कार्यासन अधिकारी, सा.न्या.व वि.स.विभाग,

१९.उपआयुक्त समाजकल्याण, सर्व प्रादेशिक विभाग.

२०. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, सर्व जिल्हे

२१.निवड नस्ती.